**मोटार वाहन विभागातील नवनियुक्त १९६ सहायक मोटार वाहन निरीक्षकांच्या २ऱ्या तुकडीसाठी महाराष्ट्र पोलीस ॲकेडमी, नाशिक या संस्थेतील आठ आठवडयाच्या उर्वरित प्रशिक्षणाच्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी- ०१२१/प्र.क्र.८/परि-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ डिसेंबर, २०२१.

वाचा : १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दि. २३/९/२०२१.
२. शासन निर्णय, गृह विभाग एमव्हीडी-०१२१/प्र.क्र.८/परि-४, दि. ०८/०३/२०२१.
३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पआका/का-१३/प्रशिक्षण-१४/ २०१९/ जा.क्र. ९७८०, दि. २२.०७.२०२१.

**प्रस्तावना :-**

उपर्निर्दिष्ट २ येथील शासन निर्णयान्वये मोटार वाहन विभागातील नव नियुक्त १९६ सहायक मोटार वाहन निरीक्षकांच्या २ऱ्या तुकडीसाठी देण्यात आलेल्या प्रशिक्षणाकरीता रुपये १,२१,३०,५००/- (रुपये एक कोटी एकवीस लाख तीस हजार पाचशे मात्र) एवढया खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. उपर्निर्दिष्ट ३ येथील पत्रान्वये परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी विनंती केल्यानुसार, मोटार वाहन विभागातील नवनियुक्त १९६ सहायक मोटार वाहन निरीक्षकांच्या २ऱ्या तुकडीच्या महाराष्ट्र पोलीस ॲकेडमी, नाशिक या संस्थेतील आठ आठवडयांच्या प्रशिक्षणासाठी उर्वरित खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मोटार वाहन विभागातील नवनियुक्त १९६ सहायक मोटार वाहन निरीक्षकांच्या २ऱ्या तुकडीच्या महाराष्ट्र पोलीस ॲकेडमी, नाशिक या संस्थेतील आठ आठवडयाच्या प्रशिक्षणासाठी खालील तक्यात नमूद केल्यानुसार रु. ९८,२१,५००/- (रुपये अठयाण्णव लाख एकवीस हजार पाचशे) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | पदाचे नाव | संस्थेचे नाव | प्रशिक्षणाचा कालावधी | प्रशिक्षणार्थीची संख्या | प्रशिक्षणाचा एकूण खर्च रक्कम | दि.८/३/२०२१ च्या शा.नि.अन्वये अदा करण्यात आलेला प्रशिक्षण खर्च रक्कम | या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येणारी उर्वरित प्रशिक्षण खर्चाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | सहायक मोटार वाहन निरीक्षक | महाराष्ट्र पोलीस ॲकेडमी, नाशिक | दि.९.१.२०२० ते दि.४.३.२०२० | १९६ | रु.२,१९,५२,०००/- | रु.१,२१,३०,५००/- | रु.९८,२१,५००/- |

२. यासाठी येणारा खर्च " मागणी क्र. बी-३, २०४१ वाहनावरील कर, (०१)(०२) मोटार वाहन विभागातील अधिकारी व कर्मचारी यांना प्रशिक्षण (योजनांतर्गत) (२०४१ ०३४१)-१३ कार्यालयीन खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला उप विभाग-तीन मधील अनुक्रमांक ४ व महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका मधील परिच्छेद २७(२) अ) नुसार एखाद्या योजनेला / प्रकल्पाला

प्रशासकीय (वित्तीय मंजूरी धरुन) मान्यता देण्याबाबत आवर्ती खर्चाच्या बाबतीत वार्षिक रुपये पन्नास लक्ष व अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रुपये पाच कोटी योजनेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना आहेत. या अधिकारान्वये सदरहू शासन निर्णय निर्गमित करण्यात आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२९१६०४०८०६२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LANGHI BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2021.12.29 16:05:03 +05'30'

**(भरत रा. लांघी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.

२) मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.

३) मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.

४) महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई/नागपूर.

५) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

६) परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/प्रशासन/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई.

७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

९) उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) उप/सह सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) कक्ष अधिकारी/अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) संचालक, महाराष्ट्र पोलीस ॲकेडमी, नाशिक.

१३) निवडनस्ती- (परि-४).